**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन ज्ञापन क्रमांक- पोप्रमा-०११७/प्र.क्र.१५/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २० मार्च २०१७.

**विषय** :- राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.८, मुंबई, यांच्या गोरेगांव (पूर्व) येथील वसाहतीत दुरुस्तींची **सात** कामे करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१./प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.

३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. पोमसं/ २७-बी/२८-बी-२/ पाणी-पुरवठा-रारापोबल-गट-क्र.३३३/२०१६, दिनांक २९.१२.२०१६.

**ज्ञापन** :-

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, यांनी त्यांच्या संदर्भाधीन पत्राद्वारे, राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.८, मुंबई, यांच्या गोरेगांव (पूर्व) येथील वसाहतीत दुरुस्तींची **सात** कामे करण्यास करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे.

२. उक्त कामासाठी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, उत्तर मुंबई, यांनी सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.६३,३२,३०१/- इतक्या खर्चाचे अंदाज सादर केले आहेत.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले आहेत व ते **रु.६३,३२,२०१/-** असे सुधारित केले आहेत. त्या अनुसार, राज्य राखीव पोलीस बल, गट क्र.८, मुंबई, यांच्या गोरेगांव (पूर्व) येथील वसाहतीत दुरुस्तींची, पोलीस महासंचालक यांच्या संदर्भाधीन पत्रात उल्लेख केलेली, **सात** कामे करण्यासाठी **रु.६३,३२,२०१/-** इतक्या खर्चाच्या अंदाजास, पुढील अटींवर, याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे : -

**अटी** :-

१) खर्चाचे अंदाज हे समादेशक, राज्य राखीव पोलीस बल, गट क्र. ८, मुंबई आणि कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, उत्तर मुंबई, यांनी साक्षांकित करावे.

२) उक्त दुरुस्तीच्या कामांच्या निविदा एकत्र मागविण्यात याव्या.

४. उक्त कामासाठी येणारा खर्च हा गृह विभाग- मागणी क्र. बी-१, २०५५, पोलीस, (००) १०९, जिल्हा पोलीस, (००) (००) (०१), जिल्हा पोलीस बल, (दत्तमत) (२०५५ ०१६८), २७, लहान बांधकामे, या खाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३९/इमा-२, दिनांक ०६.०२.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३२११२१३०८१८२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.03.21 12:14:03 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) अपर पोलीस महासंचालक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) विशेष पोलीस महानिरीक्षक, राज्य राखीव पोलीस बल, पुणे.
५) समादेशक, राज्य राखीव पोलीस बल, गट क्र. ८, मुंबई.
६) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, मुंबई.
७) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, उत्तर मुंबई, अंधेरी, मुंबई.
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
१०) निवड फाईल (पोल-७).